**अनुसूचित जातीच्या सहकारी सूत गिरण्यांना देण्यात आलेल्या दीर्घ मुदतीच्या कर्जाचे उपयोगिता प्रमाणपत्र आणि त्या अनुषंगाने सूत गिरणीच्या मशिनरींचे मुल्यांकन यांबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन निर्णय, क्रमांक : सूतगि-२०२५/ प्र.क्र. ३७ /अजाक**

मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक: ०४ एप्रिल, २०२५.

वाचा : १. शासन निर्णय, समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग, क्रमांक : एमपीसी-१०९९/ प्र. क्र. २४४/ विघयो-२, दिनांक ३० मार्च, २०००.

२. शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक : सूतगि-२००३/ ५५५/ प्र. क्र. ३३/ विघयो-२, दिनांक ०२ जुलै, २००४.

३. सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, कोल्हापूर यांचे पत्र, क्रमांक : २५१२, दिनांक १२ जून, २०२४.

प्रस्तावना :

अनुसूचित जातीच्या सहकारी सूतगिरण्यांना उपरोक्त वाचा येथील शासन निर्णयान्वये देण्यात आलेल्या दीर्घ मुदतीच्या कर्जाचे उपयोगिता प्रमाणपत्र आणि त्या अनुषंगाने सूत गिरणीच्या मशिनरींचे मुल्यांकन यांबाबत समस्या / अडचणी उद्भवत आहेत, असे शासनाच्या निदर्शनास उपरोक्त वाचा येथील ३ अन्वये आलेले आहे.

यास अनुसरुन अनुसूचित जातीच्या सहकारी सूतगिरण्यांना देण्यात आलेल्या दीर्घ मुदतीच्या कर्जाचे उपयोगिता प्रमाणपत्र आणि त्या अनुषंगाने सूत गिरणीच्या मशिनरींचे मुल्यांकन यांबाबत निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

अनुसूचित जातीच्या सहकारी सूतगिरण्यांना देण्यात आलेल्या दीर्घ मुदतीच्या कर्जाचे उपयोगिता प्रमाणपत्र आणि त्या अनुषंगाने सूत गिरणीच्या मशिनरींचे मुल्यांकन आयुक्त, वस्त्रोद्योग, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्याकडून करून घेण्यात यावे.

२. सदर शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४०४१६१७०४३७२२ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAVIN VILAS SHISHUPAL

Digitally signed by PRAVIN VILAS SHISHUPAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=e90b11f238d671a8222f53575baf1f02e1625f1f53f35c695b531bcd5b6b83fa, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CBD05D0EA86861C0C1248FD89817636DDFBE5E50BA12759A0FE7E022D790310B, cn=PRAVIN VILAS SHISHUPAL
Date: 2025.04.04 16:18:15 +05'30'

**(प्रविण शिशुपाल)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. प्रधान सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
२. प्रधान सचिव (सामाजिक न्याय), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
३. आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
४. आयुक्त, वस्त्रोद्योग, महाराष्ट्र राज्य, नागपूर,
५. जिल्हाधिकारी, सर्व,
६. प्रादेशिक उप आयुक्त, समाज कल्याण विभाग, सर्व,
७. सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, सर्व,
८. निवड नस्ती.